**प्रशासकीय मान्यता-**
**सेलू, जि. परभणी येथे नवीन न्यायालयीन इमारत बांधण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीसीबी-११२१/प्र.क्र.८३/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय , मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ७ मार्च, २०२२.

**पहा :-** मा.प्रबंधक (निरिक्षणे-२),मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)६०५९/२००९(४०)/१३०७/२६६४, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये, सेलू, जि. परभणी येथे नवीन न्यायालयीन इमारत बांधण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला होता. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सेलू, जि. परभणी येथे नवीन न्यायालयीन इमारतीचे बांधकाम करण्याकरिता रु.१५,९०,००,०००/- (रुपये पंधरा कोटी नव्वद लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशिल | प्रशासकीय मान्यतेची रक्कम पूर्ण रुपयात |
|---|---|---|
| (अ) | आवश्यक बाबी | |
| १ | (a) बांधकामाचा खर्च | ८,०७,७१,४००/- |
| | (b) रेन/रुफ वॉटर हार्वेस्टींग | २०,००,०००/- |
| | (c) अपंगांकरीता सरकता जिना (Ramp) | २,००,०००/- |
| | (d) फर्निचर | ८७,७९,५००/- |
| २ | पाणी पुरवठा मल:निस्सारण (बांधकाम खर्चाच्या ५%) | ४०,३८,५७०/- |
| ३ | विद्युतीकरण | |
| | अंतर्गत विद्युतीकरण (बांधकाम खर्चाच्या ५%) | ४०,३८,५७०/- |
| | बाह्य विद्युतीकरण (बांधकाम खर्चाच्या ६%) | ४८,४६,२८४/- |
| | अग्निशामक यंत्रणा | ५०,००,०००/- |
| | **एकूण (अ)** | **१०,९६,७४,३२४/-** |

| | | |
|---|---|---|
| (ब) | **संकिर्ण बाबी** | |
| | (१) कंपाऊंड वॉल व गेट | ५१,२०,०००/- |
| | (२) अंतर्गत रस्ते | ३६,००,०००/- |
| | (३) मैदानाचे सुशोभिकरण | २,००,०००/- |
| | (४) माती परिक्षण व भूमी परिक्षण | ५,००,०००/- |
| | (५) सी.सी.ड्रेन व सी.डी. वर्क | १०,००,०००/- |
| | **एकूण (ब)** | **१,०९,२०,०००/-** |
| (क) | **वैकल्पिक बाबी** | |
| | (१) रेनवॉटर हार्वेस्टींगकरीता भूअंतर्गत वॉटर टँक | ५,००,०००/- |
| | (२) वातानुकूलीत यंत्रणा | ४,००,०००/- |
| | (३) लिफ्ट | ५०,००,०००/- |
| | (४) एबी रुम, एरीया लायटींग, पंप, जनरेटर | ५,००,०००/- |
| | (५) सी.सी. टी.व्ही. | २,००,०००/- |
| | (६) बागबगीचा/झाडे लागवड/फ्लॅग पोस्ट | ५,००,०००/- |
| | **एकूण (क)** | **७१,००,०००/-** |
| | **प्रकल्प खर्च (अ)+(ब)+(क)** | **१२,७६,९४,३२४/-** |
| **(ड)** | इतर तरतूदी | |
| | आकस्मिक खर्च (बांधकाम खर्चाच्या ४%) | ३२,३०,८५६/- |
| | वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या १२%) | १,५३,२३,३१९/- |
| | भाववाढ (प्रकल्प खर्चाच्या १०%) | १,२७,६९,४३२/- |
| | **एकूण (ड)** | **३,१३,२३,६०७/-** |
| | **एकूण प्रकल्प खर्च रुपये (अ)+(ब)+(क)+(ड)** | **१५,९०,१७,९३१/-** |
| | **म्हणजेच एकूण रुपये** | **१५,९०,००,०००/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

५) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

९) अंदाजपत्रकीय कामात बदल होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नये.

११) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास, याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पद्धतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना- केंद्र हिस्सा), (२१) (०१) मोठी बांधकामे(कार्यक्रम),५३-मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १३५/२०२१/ इमा-२, दिनांक २६ ऑक्टोबर, २०२१, नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक : २१६/१४४३, दिनांक २३ नोव्हेंबर, २०२१, वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक : १४९/व्यय-५, दिनांक ११ फेब्रुवारी, २०२२ आणि मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या दिनांक २४ फेब्रुवारी, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/का-१३, विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०३०७१३२५५९४११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीत साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.03.07 13:27:55 +05'30'

**(नितिन वि. जिवने)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१)मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२)मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३)मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४)मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५)मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, परभणी.
६)मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
७)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड.
९)अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेलू, जिल्हा परभणी.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग (ईमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९) निवड नस्ती/संग्रहार्थ.